**जलस्वराज्य -२ कार्यक्रम**
पाणी पुरवठा व स्वच्छता क्षेत्राच्या (पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष आणि ग्रा.पा.पु. उपविभाग) बळकटीकरणासाठीची पदनिर्मिती ...

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जस्वप्र-०२१४/प्र.क्र. ३४/पापु-११**
७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
नविन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
तारीख: १७ फेब्रुवारी, २०१४

**वाचा**

१) **शासन निर्णय क्रमांक : जस्वप्र-१२१३/प्र.क्र.२००/पापु-११ दि. ०४/०१/२०१४**
२) **शासन निर्णय क्रमांक : जस्वप्र-०११४/प्र.क्र. ०५/पापु-११ दि. ०६/०२/२०१४**

**प्रस्तावना**

जागतिक बँकेच्या सहाय्याने राज्यातील ग्रामीण भागात मागणी आधारित व लोकसहभाग तत्वावर जलस्वराज्य-२ कार्यक्रम राबविण्याचे निश्चित झाले आहे. या कार्यक्रमाचा कालावधी कार्यक्रम सुरु झाल्यापासून सहा वर्षांचा राहणार आहे. या कार्यक्रमाचे नियोजन पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाने केले असून कार्यक्रम अंमलबजावणीचे संनियंत्रण या कक्षामार्फत केले जाणार आहे.

या कार्यक्रमांतर्गत पाणी व स्वच्छता क्षेत्रातील विविध स्तरावरील अंमलबजावणी यंत्रणांची क्षमता बांधणी करणे, माहिती, शिक्षण व संवाद, जन जागृती, सक्रिय लोकसहभाग मिळविणे इत्यादी कार्ये हाती घेण्यात येणार आहेत. पाणी व स्वच्छता क्षेत्रामधील विविध कार्यक्रमांतर्गत मृदू घटकांच्या नियोजन व अंमलबजावणीसाठी राज्य स्तरावर पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) स्थापन करण्यात आली असून या संस्थेच्या मार्गदर्शनाखाली जिल्हा स्तरावर जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष तसेच गट स्तरावर गट संसाधन केंद्रे यांचे मार्फत मृदू घटकांची अंमलबजावणी करण्यात येते.

जलस्वराज्य-२ कार्यक्रमासाठी देखील मृदू घटकांची अंमलबजावणी या संस्थांच्या मार्फतच करण्यात येणार आहे. त्यासाठीच्या नियोजन व अंमलबजावणीचे संनियंत्रण व समन्वय जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष तसेच गट संसाधन केंद्रे यांच्या मार्फत होणार आहे.

सर्व क्षेत्रीय संस्थांचे बळकटीकरण करणे आणि संस्थांमध्ये तज्ञ मनुष्यबळ उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. याचा विचार करुन या क्षेत्रीय संस्थांच्या बळकटीकरणासाठी आवश्यक असलेल्या पदनिर्मितीस दिनांक २० नोव्हेंबर, २०१३ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीत मान्यता देण्यात आली आहे.

## शासन निर्णय

वरील बाबींचा विचार करता पाणी व स्वच्छता क्षेत्रामधील विविध स्तरावरील संस्थांच्या बळकटीकरणासाठीच्या पदनिर्मितीबाबत मंत्रीमंडळाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**१) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो)**

**अ)** पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेमध्ये पाणी गुणवत्ता संदर्भातील माहितीचे विश्लेषण करणे, माहिती संकलनासंदर्भात तसेच सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात जिल्हा स्तरावरील, गट स्तरावरील व ग्राम स्तरावरील अंमलबजावणी यंत्रणांना मार्गदर्शन करणे आणि त्यासंदर्भातील अभियांत्रिकी कामांचे नियोजन, संनियंत्रण व मूल्यमापन करणे यासाठी खालील प्रमाणे तात्पुरती पदे जलस्वराज्य-२ कार्यक्रम कालावधीपुरती निर्माण करण्यात येत आहेत व कार्यक्रम कालावधीनंतर ही सर्व पदे व्यपगत होतील.

| अ. क्र. | पदाचे नांव | वेतन व वेतन श्रेणी / एकत्रित मानधन | एकूण पदे | नियुक्तीचा प्रकार (प्रतिनियुक्ती/ कंत्राटी) |
|---|---|---|---|---|
| १ | अभियांत्रिकी तज्ञ (सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन) | रू. ५००००/- | १ | कंत्राटी |
| २ | अभियांत्रिकी तज्ञ (पाणी गुणवत्ता) | रू. ५००००/- | १ | कंत्राटी |
| ३ | माहिती विश्लेषक | रू. ३००००/- | १ | कंत्राटी |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४ | समन्वयक (पाणी गुणवत्ता) | रू. ३००००/- | १ | कंत्राटी |
| ५ | कनिष्ठ/ शाखा अभियंता | रू. ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४००/- | २ | प्रतिनियुक्ती |
| **एकूण** | | | ६ | |

**ब)** ही पदे माहिती विश्लेषक हे पद (वगळून) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांच्या प्रशासकीय व उप सचिव, पापुवस्ववि यांच्या पर्यवेक्षकीय नियंत्रणाखाली कार्यरत राहतील. माहिती विश्लेषक हे पद क्षेत्र स्तरावरील पाणी व स्वच्छतेबाबत संनियंत्रण व मूल्यमापन प्रणाली तयार करण्यासाठी प्रकल्प व्यवस्थापक, सु.स. व प्र.व्य. कक्ष यांच्या प्रशासकीय व प्रकल्प संचालक यांच्या पर्यवेक्षकीय नियंत्रणाखाली कार्यरत राहिल.

**क)** उपरोक्त पदे प्रतिनियुक्तीने /कंत्राटी पध्दतीने भरताना वर्तमानपत्रामध्ये जाहिरात देऊन अर्ज मागविण्यात येतील. प्रतिनियुक्तीने पदे भरताना जास्त प्रतिसाद मिळण्यासाठी जाहिरातीद्वारे मागविलेल्या अर्जाव्यतिरिक्त संबंधित यंत्रणा /प्राधिकरणांकडून इच्छुक उमेदवारांची नावे मागविण्यात येतील. प्रतिनियुक्तीवर अधिकारी / कर्मचारी उपलब्ध न झाल्यास आवश्यकतेनुसार कंत्राटी पध्दतीने तसेच कंत्राटी पध्दतीने भरावयाचे मनुष्यबळ उपलब्ध न झाल्यास प्रतिनियुक्तीने पदे भरण्यासाठीचा निर्णय घेण्याचे अधिकार प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे राहतील.

**ड)** कनिष्ठ/ शाखा अभियंता हे पद प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी अर्हता प्राप्त उमेदवारांची मुलाखत घेऊन त्यामध्ये मिळालेल्या गुणांच्या आधारे गुणानुक्रमानुसार परिशिष्ट-१ अन्वये निवड करण्यात येईल.

**२) जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष, जिल्हा परिषदा (सर्व ३३ ग्रामीण जिल्हे)**

**अ)** पाणी व स्वच्छता क्षेत्रामधील विविध कार्यक्रमांतर्गत मृदू घटकांच्या अंमलबजावणीचे जिल्हा स्तरीय नियोजन, संनियंत्रण व समन्वय जिल्हा परिषदांतर्गत जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षांमार्फत करण्यात येते. या कक्षांचे बळकटीकरण करण्यासाठी सर्व ग्रामीण जिल्हयांमध्ये खालील तात्पुरती पदे कार्यक्रम कालावधीपुरती निर्माण करण्यात येत आहेत व कार्यक्रम कालावधीनंतर ही सर्व पदे व्यपगत होतील.

| अ. क्र. | पदाचे नांव | वेतन व वेतन श्रेणी / एकत्रित मानधन | प्रति जिल्हा | एकूण पदे | नियुक्तीचा प्रकार (प्रतिनियुक्ती/ कंत्राटी) |
|---|---|---|---|---|---|
| १ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) | रू. १५६००-३९१०० ग्रेड वेतन ५४०० | १ | ३३ | प्रतिनियुक्तीने |
| २ | कार्यालय अधिक्षक | रू. ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४००/४३०० | १ | ३३ | प्रतिनियुक्तीने |
| ३ | लेखाधिकारी | रू. ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४०० | १ | ३३ | प्रतिनियुक्तीने |
| ४ | लिपिक | रू. ५२००-२०२०० ग्रेड वेतन १९०० | १ | ३३ | प्रतिनियुक्तीने |
| ५ | अभियांत्रिकी तज्ञ (सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन / पाणी गुणवत्ता तज्ञ) | रू. २५०००/- | १ | ३३ | कंत्राटी |
| | एकूण | | ५ | १६५ | |

**ब)** उपरोक्तपैकी अक्र. २ ते ५ वरील पदे उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली व मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. यांच्या पर्यवेक्षकीय नियंत्रणाखाली कार्यरत राहतील. जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष तसेच गट संसाधन केंद्रे ही उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) यांच्या अधिपत्याखाली कार्यरत राहतील. उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जिल्हा परिषद हे पद मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या प्रशासकीय व संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो) तसेच प्रकल्प व्यवस्थापक, सुसप्रव्यकक्ष यांच्या पर्यवेक्षकीय नियंत्रणाखाली कार्यरत राहील.

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत केंद्र पुरस्कृत निर्मल भारत अभियान व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम जिल्हा परिषदेमार्फत राबविण्यात येत आहेत. निर्मल भारत अभियानांतर्गत संपूर्ण कार्यभार, राष्ट्रीय

ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत Support Activities तसेच पाणी गुणवत्ता संनियंत्रण व सर्वेक्षण (WQM&S) यांचा कार्यभार उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.)यांचेकडे सध्या सोपविण्यात आलेला आहे. ह्या कामांसाठी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) हे समर्पित पद जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत निर्माण केले असून यापुढे ही कामे त्यांचे मार्फत करण्यात येणार आहे.

**क)** उपरोक्तपैकी उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) हे पद ग्राम विकास विभाग म.शा. अंतर्गत महाराष्ट्र विकास सेवा गट अ- संवर्गामधील अधिकाऱ्यांमधून तसेच लेखाधिकारी हे पद वित्त विभाग, म.शा. अंतर्गत महाराष्ट्र वित्त व लेखा सेवा गट - ब संवर्गामधील अधिकाऱ्यांमधून शासन स्तरावरून भरण्यात येतील.

उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) हे पद ग्राम विकास विभागाने उपलब्ध करून न दिल्यास हे पद महाराष्ट्र शासनाच्या इतर विभागांतर्गत समकक्ष संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील. त्यासाठी वर्तमानपत्रामध्ये जाहिरात देऊन अर्ज मागविण्यात येतील. ही पदे प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी अर्हता प्राप्त उमेदवारांची मुलाखत घेऊन त्यामध्ये मिळालेल्या गुणांच्या आधारे गुणानुक्रमानुसार परिशिष्ट-१ अन्वये निवड करण्यात येईल.

कार्यालय अधिक्षक आणि लिपिक ही पदे जिल्हा परिषदांतर्गत संबंधित जिल्हा सेवा संवर्गार्मधून मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. यांचे स्तरावरुन भरण्यात येतील.

**३) ग्रामीण पाणी पुरवठा उपविभागीय कार्यालये (सर्व ३३ ग्रामीण जिल्ह्यांमधील १७३ उप विभाग)**

**अ)** ग्रामीण पाणी पुरवठा उप विभागीय कार्यालयांकडून ग्रामपंचायतींना पाणी गुणवत्ता संदर्भात योग्य मार्गदर्शन व्हावे, सदर बाबतीत सुसूत्रता निर्माण होऊन संनियंत्रण व मूल्यमापन योग्य पध्दतीने व्हावे तसेच ग्राम स्तरावरील लेखे अद्ययावत व संगणकीकृत करण्यासाठी मार्गदर्शन व समन्वय व्हावा यासाठी ग्रामीण पाणी पुरवठा उपविभागीय कार्यालयांमध्ये खालील तात्पुरती पदे कार्यक्रम कालावधीपुरती निर्माण करण्यात येत आहेत व कार्यक्रम कालावधीनंतर ही सर्व पदे व्यपगत होतील. सदर पदे ग्रामीण पाणी पुरवठा उप विभागांच्या कार्यक्षेत्रातील तालुक्यांसाठी कार्यरत राहतील.

| अ. क्र. | पदाचे नांव | वेतन व वेतन श्रेणी / एकत्रित मानधन | प्रति उप विभाग | एकूण पदे | नियुक्तीचा प्रकार |
|---|---|---|---|---|---|
| १ | सल्लागार (पाणी गुणवत्ता-उपविभाग) | रू. ८०००/- | १ | १७३ | कंत्राटी |
| २ | ग्रामलेखा समन्वयक | रू. ८०००/- | १ | १७३ | कंत्राटी |
| एकूण | | | २ | ३४६ | |

**ब)** ही पदे उप अभियंता, ग्रा.पु.पा. उप विभाग, जिल्हा परिषद यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता), जि.प. यांच्या पर्यवेक्षकीय नियंत्रणाखाली कार्यरत राहतील.

**४)** या शासन निर्णयाद्वारे पाणी व स्वच्छता क्षेत्रामधील संस्थांच्या बळकटीकरणासाठी निर्माण करण्यात येत असलेल्या पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या सोबत परिशिष्ट - २ मध्ये जोडले आहेत.

**५) कंत्राटी पध्दतीने पदभरती**

या शासन निर्णयान्वये मंजूर कंत्राटी पदे (ग्रामीण पाणी पुरवठा उप विभागीय कार्यालयातील पदे वगळून) भरताना अर्हता प्राप्त उमेदवारांपैकी गुणानुक्रमानुसार १:१० प्रमाणात गट चर्चेसाठी (Group Discussion) उमेदवार निवडण्यात येतील. गट चर्चेमधून १:५ या प्रमाणात गुणानुक्रमानुसार उमेदवार निवडून त्यांच्या मुलाखती घेण्यात येतील. गट चर्चा आणि मुलाखतीमध्ये मिळालेल्या गुणांच्या आधारे गुणानुक्रमानुसार उमेदवारांची निवड परिशिष्ट-१ अन्वये करण्यात येईल. कंत्राटी पदांसाठीची किमान अर्हता (शैक्षणिक व अनुभव) सोबत परिशिष्ट - ३ मध्ये जोडले आहे. कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करताना कमाल वय मर्यादा ५० वर्षे राहील. मात्र सेवानिवृत्त सरकारी/ निम सरकारी अधिकारी/ कर्मचाऱ्यांची कंत्राटी पदावर नियुक्ती करताना वयाची कमाल मर्यादा ६५ वर्षे राहील.

ग्रामीण पाणी पुरवठा उप विभागीय कार्यालयातील सल्लागार पाणी गुणवत्ता- उपविभाग व ग्राम लेखा समन्वयक ही कंत्राटी पदे भरताना वर्तमानपत्रामध्ये जाहिरात देऊन अर्हता प्राप्त उमेदवारांची मुलाखत घेऊन त्यामध्ये मिळालेल्या गुणांच्या आधारे गुणानुक्रमानुसार परिशिष्ट-१ अन्वये निवड करण्यात येईल.

**निवड समितीची रचना**

**अ)** पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो)मधील भरावयाच्या पदांसाठीची निवड समिती खालील प्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | अध्यक्ष |
| २ | उप सचिव तथा प्रकल्प संचालक, पापुवस्ववि | सदस्य |
| ३ | प्रकल्प व्यवस्थापक, सुसप्रव्यकक्ष | सदस्य |
| ४ | संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था | सदस्य |
| ५ | अतिरिक्त संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था | सदस्य |
| ६ | अवर सचिव (पापु-२५), पापुवस्ववि | सदस्य सचिव |

**ब)** जिल्हा परिषदेंतर्गत अभियांत्रिकी तज्ञ (सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन / पाणी गुणवत्ता)या पदाची निवड जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामधील विषय तज्ञ/ सल्लागार यांच्या निवडीसाठी गठित करण्यात आलेल्या निवड समितीमार्फत करण्यात येईल.

**क)** उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पाणी व स्वच्छता) ह्या पदांसाठी अधिकारी ग्राम विकास विभागाकडून उपलब्ध न झाल्यास परिच्छेद २ (क )प्रमाणे या पदाची भरती उपरोक्त संदर्भांकित शासन निर्णय क्र. २ अन्वये प्रधान सचिव, पापुवस्ववि यांच्या अध्यक्षतेखाली गठित समिती मार्फत करण्यात येईल.

**ड)** ग्रामीण पाणी पुरवठा उपविभागीय कार्यालयांमधील कंत्राटी पद भरतीसाठी निवड समिती खालील प्रमाणे राहील.

| | | |
|---|---|---|
| १ | मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २ | जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३ | मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ४ | वरिष्ठ भूवैज्ञानिक-,भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | सदस्य |
| ५ | कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जि.प. | सदस्य |
| ६ | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रा.पं.), जि.प. | सदस्य सचिव |

**६) कंत्राटी पदांचे मानधन व करारनामा**

कंत्राटी पध्दतीने भरावयाच्या पदांसाठी ठोक मानधन अनुज्ञेय राहील. संबंधितांसमवेत करारनामा करुन ११ महिन्यांसाठी कंत्राटी पध्दतीने नियुक्ती करण्यात येईल. कंत्राटी पध्दतीने नियुक्ती/ मुदतवाढ देताना सोबत जोडलेल्या परिशिष्ट-४ मधील नमून्यानुसार मुद्रांकपत्रावर बंधपत्र करण्यात येईल.

**७) कंत्राटी पदांचे कार्यमूल्यमापन**

कंत्राटी तज्ञ/ कर्मचाऱ्यांसोबतचा करार संपूष्टात येण्यापूर्वी किमान दोन महिने आधी त्यांचे कार्यमूल्यमापन आढावा प्रक्रिया सुरू करुन ही प्रक्रिया करार संपूष्टात येण्यापूर्वी पूर्ण करण्यात येईल. कंत्राटी पध्दतीने नियुक्त केलेल्या कर्मचाऱ्यांचे कार्यमूल्यमापन करून काम समाधानकारक आढळल्यास त्यांना एक दिवसाचा तांत्रिक खंड देऊन मुदतवाढ देण्यात येईल. मुदतवाढ दिलेल्या कर्मचाऱ्यांना ८% वार्षिक मानधनवाढ अनुज्ञेय राहील.

**८) अनुज्ञेय रजा**

कंत्राटी पदांवरील नियुक्त तज्ञ/ कर्मचारी यांना प्रतिवर्षी (कॅलेंडर वर्षानुसार) १० (दहा) दिवस नैमित्तीक रजा आणि १५ (पंधरा) दिवस वैद्यकीय रजा अनुज्ञेय राहतील. कॅलेंडर वर्षामधील सेवा अवधीच्या प्रमाणात रजा अनुज्ञेय राहतील.

**९) प्रवास व दैनिक भत्ता**

कंत्राटी तज्ञ/ कर्मचाऱ्यांनी शासकीय कामासाठी प्रत्यक्ष केलेल्या प्रवासासाठी खालील प्रमाणे प्रवास व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहील.

| अक्र. | ठोक मानधन | अनुज्ञेय दर |
|---|---|---|
| १ | रू. ५०,०००/- पेक्षा जास्त | रू. ५४००/- व त्याहून अधिक मात्र रू. ६६००/- पेक्षा कमी ग्रेड वेतन घेणाऱ्या गट 'अ' मधील शासकीय अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दराने |
| २ | रू. ३०,०००/- ते ४९,९९९/- | रू. ४४००/- व त्याहून अधिक मात्र रू. ५४००/- पेक्षा कमी ग्रेड वेतन घेणाऱ्या गट 'ब' मधील शासकीय अधिकाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दराने |
| ३ | रू. १२,०००/- ते २९,९९९/- | रू. ४२००/- पेक्षा कमी ग्रेड वेतन घेणाऱ्या गट 'क' मधील शासकीय कर्मचाऱ्यांना अनुज्ञेय असलेल्या दराने |

**१०) ओळखपत्र**

प्रतिनियुक्तीवर नियुक्त अधिकारी/ कर्मचारी तसेच कंत्राटी तत्वावर नियुक्त तज्ञ/ कर्मचाऱ्यांना संबंधित यंत्रणेमधील आस्थापना अधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीने सोबतच्या परिशिष्ट-५ मध्ये दिलेल्या नमून्यानुसार ओळखपत्र देण्यात येईल.

**११) राजीनामा**

कंत्राटी पदांवरील नियुक्त तज्ञ/ कर्मचारी यांना करारनाम्याच्या कालावधीमध्ये राजीनामा द्यावयाचा असेल तर त्यासाठी दोन महिने आधी लेखी पूर्व सूचना द्यावी लागेल. राजीनामा देण्यासाठी दोन महिने आधी लेखी पूर्व सूचना न दिल्यास दोन महिन्यांचे मानधन भरणा करावे लागेल. पूर्व सूचनेचा कालावधी दोन महिन्यांपेक्षा कमी असल्यास कमी कालावधीच्या प्रमाणामध्ये मानधन भरणा करणे बंधनकारक राहील.

**१२) वेतन/ मानधन अदायगी**

**अ)** पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेच्या बळकटीकरणासाठी मंजूर पदांचे वेतन व भत्ते भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथे उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (आरएसपीएमयु), यांचे नावे जलस्वराज्य-२ कार्यक्रमासाठी उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी खाते क्रमांक ६१८४३५००१० मधील उपलब्ध निधीमधून आहरित करून संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत उघडलेल्या बँक खात्यामध्ये संवितरित करण्यात येईल व उपलब्ध करुन दिलेल्या वित्त प्रेषणामधून सदर पदांचे वेतन व भत्ते अदा करण्यात येतील.

**ब)** जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष, जिल्हा परिषदा आणि ग्रामीण पाणी पुरवठा उप विभाग यांच्या बळकटीकरणासाठी मंजूर पदांचे वेतन व भत्ते भारतीय रिझर्व्ह बँक, मुंबई येथे उप सचिव तथा प्रकल्प संचालक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष (आरएसपीएमयु), यांचे नावे जलस्वराज्य-२ कार्यक्रमासाठी उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी खाते क्रमांक ६१८४३५००१० मधील उपलब्ध निधीमधून आहरित करून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा यांनी जलस्वराज्य-२ कार्यक्रमांतर्गत उघडलेल्या बँक खात्यामध्ये संवितरित करण्यात येईल व उपलब्ध करुन दिलेल्या वित्त प्रेषणामधून सदर पदांचे वेतन व भत्ते अदा करण्यात येतील.

**१३)** कंत्राटी पध्दतीने नियुक्त केलेल्या सर्व नेमणूका करार संपल्यानंतर संपूष्टात येतील. कंत्राटी तत्वावर नेमलेल्या तज्ञ/ कर्मचारी यांना या कंत्राटी सेवेच्या आधारे शासनाच्या नियमित सेवेत सामावून घेतले जाणार नाही.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६/१४१४, दि. १० मे, २०१३ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४८२/ व्यय-३, दि. ३० ऑगस्ट, २०१३ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१४०२१७१५३५०२५८२८ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Gitte
Digitally signed by Kiran Gitte
DN: CN = Kiran Gitte, C = IN, S = Maharashtra, O = ALL INDIA SERVICE, OU = IAS
Date: 2014.02.17 17:31:09 +05'30'

**(किरण गित्ते)**
**उप सचिव तथा संचालक**
**महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. **मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई-२६**

२. मा. मुख्यमंत्री, म.रा. यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उप मुख्यमंत्री, म.रा. यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), म.रा.यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५. मा.मंत्री (सर्व), म.रा. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
६. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता), म.रा. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
७. मा.राज्यमंत्री (सर्व), म.रा. यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
८. मा. विधानसभा/विधान परिषद सदस्य, विधान भवन, मुंबई-३२
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, महाराष्ट्र शासन, तथा सदस्य, शक्ती प्रदान समिती
१०.अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, महाराष्ट्र शासन तथा अध्यक्ष शक्ती प्रदान समिती
११.प्रधान सचिव, ग्रामविकास व पंचायतराज विभाग, महाराष्ट्र शासन तथा सदस्य, शक्ती प्रदान समिती
१२.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, महाराष्ट्र शासन, मुंबई
१३.प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, महाराष्ट्र शासन तथा विशेष निमंत्रित, शक्ती प्रदान समिती
१४.प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, महाराष्ट्र शासन तथा सदस्य शक्ती प्रदान समिती
१५.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय
१६.प्रधान सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र शासन तथा सदस्य शक्ती प्रदान समिती
१७.विभागीय आयुक्त (सर्व)
१८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
१९.संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
२०.महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
२१.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
२२.जिल्हाधिकारी (सर्व)
२३.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा (सर्व)
२४.मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)
२५.उप संचालक (आरोग्य सेवा), राज्य सार्वजनिक आरोग्य प्रयोगशाळा, पुणे
२६.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई
२७.अतिरिक्त संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, नवी मुंबई

२८. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई

२९.उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, (सर्व)

३०.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

३१.अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

३२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषदा (सर्व)

३३.प्रादेशिक उप संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)

३४.कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व)

३५.कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषदा (सर्व)

३६.जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)

३७.उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत/ पाणी व स्वच्छता) जिल्हा परिषदा (सर्व)

३८. गटविकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)

३९.पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने

४०.मंत्रालयातील सर्व विभाग

४१.निवड नस्ती, पा.पु.-११

(शासन निर्णय क्र. जस्वप्र-०२१४/प्र.क्र. ३४/पापु-११, दिनांक १७/०२/२०१४ चे जोडपत्र)

**परिशिष्ट -१**

पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष आणि ग्रा.पा.पु. उपविभाग या कार्यालयांमध्ये पदभरतीबाबत गुण दर्शविणारा तक्ता

| **अ. क्र** | **पदाचे नांव** | **गट चर्चा** (Group Discussion) | **मुलाखतीसाठीचे गुण** | | | | | | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | **किमान शैक्षणिक अर्हतेपेक्षा अधिक अर्हता** | **तांत्रिक ज्ञान** | **क्षेत्र विषयक ज्ञान** | **क्षेत्रामधील अनुभव** | **व्यक्तीमत्व** | **एकूण** | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० = ३ +९ |
| **पाणी व स्वच्छता सहाय्य संस्थेमधील पदे** | | | | | | | | | |
| १ | अभियांत्रिकी तज्ञ (सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन) | २० | ०५ | --- | १० | १० | ०५ | ३० | ५० |
| २ | अभियांत्रिकी तज्ञ (पाणी गुणवत्ता) | २० | ०५ | --- | १० | १० | ०५ | ३० | ५० |
| ३ | माहिती विश्लेषक | २० | ०५ | --- | १० | १० | ०५ | ३० | ५० |
| ४ | समन्वयक (पाणी गुणवत्ता) | २० | ०५ | --- | १० | १० | ०५ | ३० | ५० |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ५ | कनिष्ठ/शाखा अभियंता | --- | ०५ | १० | १० | -- | ०५ | ३० | ३० |
| **जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्ष, जिल्हा परिषदेमधील पद** | | | | | | | | | |
| १ | अभियांत्रिकी तज्ञ (सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन / पाणी गुणवत्ता तज्ञ) | २० | ०५ | ---- | १० | १० | ०५ | ३० | ५० |
| **उप विभागीय कार्यालयामधील पदे** | | | | | | | | | |
| १ | सल्लागार (पाणी गुणवत्ता) | गट चर्चा लागु राहणार नाही. | ०५ | ---- | १० | १० | ०५ | ३० | ३० |
| २ | ग्रामलेखा समन्वयक | | ०५ | ---- | १० | १० | ०५ | ३० | ३० |

(शासन निर्णय क्र. जस्वप्र-०२१४/प्र.क्र. ३४/पापु-११, दिनांक १७/०२/२०१४ चे जोडपत्र)

## परिशिष्ट -२

## कर्तव्ये व जबाबदाऱ्या

### अ) पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था (वासो)

| **Sr. No.** | **Position** | **Roles and responsibilities** |
|---|---|---|
| 1 | Engineering specialist (Solid Liquid Waste Management) | • To establish planning system for SLWM for delivering long term Solid Waste Management (SWM) services in the RWSS sector in the state.<br>• To devise mechanism for providing trained capacity in the RWSS sector for SLWM planning and implementation. Lack of financial arrangement to implement and maintain waste management facilities<br>• To support the WSSD for policy formulation and for establishing institutional mechanisms to implement SLWM projects through private participation<br>• To provide technical knowhow about various low cost, situations specific, environment friendly technologies for the RWSS sector institutions.<br>• To be responsible for the implementation of SLWM component in Peri-Urban areas under JS-II programme.<br>• To coordinate with JS II team for planning the sullage management systems & its implementation in peri urban areas.<br>• To review , monitor & supervise the sullage units in districts under JA-II<br>• To co ordinate JS-II team for preparing M & E module of sullage systems.<br>• To redress grievances relating to sullage systems under JS -II<br>• To help in planning IEC activities relating to sullage management of JS-II and IEC cell of WSSO<br>• To be responsible for any other task/tasks assigned by Director, WSSO, Dy. Secretary and Principal Secretary, WSSD.<br>• To design IEC strategy for promoting SLWM&WQ and to organise campaigns for developing awareness and civic sense among citizens about SLWM&WQ.<br>• To develop capacity of the GPs and RWSS sector institutions to deliver comprehensive and sustainable solid & liquid waste management plans for GPs in terms of financial and technological aspects.<br>• Design and implement projects which are financially viable, especially in terms of funding through PPP and VGF mechanisms.<br>• Strengthening revenue generation mechanisms and devising long term operative plans of solid waste management schemes. |

| | | |
|---|---|---|
| | | • Design of projects that are technologically viable suitable for local ULB conditions.<br>• Amenable to the existing local laws and regulations.<br>• To design, structure, and manage SLWM and WQ programmes effectively in the Gram Panchayats.<br>• To devise a mechanism for revenue generation for the GPs through SLWM& WQMS system.<br>• To do analysis and evaluation of existing situation of solid and liquid waste management as well as water quality monitoring and surveillance systems in GPs and to identify relevant key weaknesses and gaps.<br>• To review current waste management practices for collection, segregation, storage, transportation, processing and disposal etc.<br>• To study, analyse and identify deficiencies in the existing SLWM&WQ system, review the engineering and environmental problems and suggest remedies for the same.<br>• To estimate quantity and composition of overall waste generated and types of wastes generated from different sources. d) Predictions on future solid waste scenario for the city area based upon demographic and economic growth trends<br>• To estimate costs of SLWM&WQ services and extent of cost recovery through user charges.<br>• To analyse current SLWM&WQ policy, institutional and financial issues and weaknesses that need to be addressed at the policy level.<br>• Prepare Monthly and Quarterly Progress Reports for all SLWM& WQMS activities;<br>• Prepare Minutes/Official notes of the meetings of the SLWM& WQ Working groups;<br>• Prepare Minutes from the meetings with the consultants.<br>• To analyse extent and scope for private sector participation and self-sustenance in providing SLWM& WQMS services in the GPs in future.<br>• To review and study waste treatment, least cost disposal technologies, possible sites for processing and land filling and suggest suitable sites taking into consideration innovative, feasible and viable technological options.<br>• To carry out appropriate 'surveys' for collection of data on waste generated and SLWM practices in the local bodies.<br>• To develop detailed guidelines/manual for the GPs for designing an efficient SLWM & WQMS system.<br>• To provide type designs of the SLWM & WQ system, along with detailed specifications using viable and innovative technology options, provide engineering drawings and detailed costs of projects, model bid documents, environmental and social safeguards framework, clearly delineating responsibilities of GPs, the costs |

| | | |
|---|---|---|
| | | estimated to be borne by them and the modes of cost recovery envisaged to be adopted by the GPs.<br>• To design and roll out an effective capacity building programme to orient the GPs for their role in SLWM& WQMS system, encouraging management in a specialised and effective manner, empowering and capacity building. |
| 2 | Engineering Specialist (Water Quality) | • To prepare district wise Annual Action Plan for water quality testing and to ensure taking of water samples and carrying out laboratory testing of samples for chemical or microbiological parameters and to take constant review and report to the Director, WSSO, Project Manager, RSPMU and Project Director on monthly basis.<br>• To monitor drinking water supply for compliance with state drinking water standards/protocols.<br>• To organise campaigns for water quality testing.<br>• To analyse statistical data on water quality samples;<br>• To visit sites of potential sources of pollution or contamination of drinking water and undertake mitigation measures and recommend WQ process changes.<br>• To assist in developing and enforcing a pollution prevention program.<br>• To monitor and ensure compliance with established methods, guidelines, standards, and procedures.<br>• To ensure water sampling from pipelines.<br>• To help in planning the IEC activities relating to sullage management in JS-II and IEC cell of WSSO.<br>• To coordinate JS-II team for preparing M&E module of water quality<br>• Any other work assign by additional director, Dy. Secretary, Principal Secretary, WSSD.<br>• To monitor the physical and financial progress of projects.<br>• To prepare periodical reports on water quality and submit to the WSSD with recommendations.<br>• To support in developing sustainability measures for drinking water sources.<br>• To monitor data regarding rainfall (rain guage stations) and groundwater levels (observation wells), water production/consumption and projections about availability.<br>• To liaise with various authorities for water quality mitigation and surveillance;<br>• To develop computer simulations and analyse water quality issues with the help of these.<br>• To investigate reasons for lapses in water quality and to suggest solutions to these problems;<br>• To arrange for emergency action in response to incidents;<br>• To prepare guidelines for maintenance /preventive maintenance of wells, hand pumps, bore wells, pumps/ boosters, reservoirs etc. |

| | | |
|---|---|---|
| | | • To conduct research studies related to water quality and to organise field surveys;<br>• To design schemes for water quality mitigation and to prepare detailed guidelines for implementation and O&M.<br>• To undertake procurement of goods and services for WQM&S and to prepare tender documents for the same.<br>• To support the WSSO and WSSD for policy formulation regarding WQM&S issues.<br>• To supervise and assess the work of staff responsible for water quality.<br>• To prepare guidelines for safe operating procedures in water quality sampling, testing in the laboratories and handling of related chemicals/ equipments.<br>• To co-ordinate with the WSSD, GoM and all implementing agencies/line departments for various WQMS issues.<br>• To organise visits/inspections in the programme areas with prior permission of the competent authority.<br>• To prepare and submit periodical progress reports and other necessary reports to the Programme Manager/the Programme Director.<br>• To resolve disputes on water quality related issues in implementation.<br>• To co-ordinate and liaison with team members for the smooth functioning of the programme activities.<br>• To be responsible for any other related task/tasks assigned by the Programme Director or the Director, WSSO.<br>• To design a proper and comprehensive MIS for the WQM&S activities in the state.<br>• To maintain and upgrade, with the help of M&E Specialist, computerized database related to the water quality management activities and generation of periodical progress reports.<br>• To assess the performance of the staff related with water quality management work.<br>• To prepare a broad WQ map for all districts by using GPS/GIS techniques and scientific interpretation.<br>• To coordinate with the CBS, RSPMU to design, develop and implement appropriate Capacity Building plan for the stakeholders responsible for water quality and implement the same in order to improve understanding of the mechanisms proposed for WQM&S.<br>• To review and compile information about water quality from various databases and maintains records of the same.<br>• To perform any other related duties as assigned by the WSSO or WSSD |
| 3 | Data Analyst | • To be responsible for M&E framework and will work with M&E specialist in RSPMU.<br>• To analyse the M&E capacity of the implementing agencies to monitor the programme & investments, quality of supervision that exists & the |

<table>
<tr><td></td><td></td><td>one needed, roles of different implementing agencies/ stakeholders in monitoring & reporting, quality of information & quality of monitoring.<br>• To analyse the reporting arrangements existing at all levels (GP level to State level), Quality of reporting, mechanisms for the flow of information, stakeholders responsible for producing reports, what decision can be triggered using the reports.<br>• To analyse type of information system that is in place to capture and aggregate data and mechanisms to improve the same.<br>• To analyse the mechanism for the knowledge management & information dissemination.<br>• To analyse the base line data required, quality of past evaluations if any, need of impact analysis and its areas.<br>• To analyse strengths and the weaknesses of local information / knowledge supply.<br>• To evaluate monitoring and evaluation systems at different levels- village, block, district, and State- by developing appropriate indicators for assessing the process, progress, performance, equity and impact of RWSS programs<br>• To analyse whether the system is generating reports on time for enabling timely decision making.<br>• To analyse whether system is user friendly, participatory for involving village level stakeholders.<br>• To analyse methodology, including sampling plan, source of information, instruments for data collection, field procedures, and quality control plan;<br>• To assess the opportunities for engaging research institutes, universities, CSOs in M&E system.<br>• To be responsible for any other related task/tasks assigned by the Programme Director or the Programme Manager.</td></tr>
<tr><td>4</td><td>Coordinator (Water Quality)</td><td>• He will work in water quality Cell in WSSO and will coordinate with engineering specialist (SLWM and WQ)<br>• To be responsible for monitoring and coordinating for physical progress of the sector programmes in water quality.<br>• To assist engineering specialist in all his work (refer concerned ToR).<br>• To follow up with the agencies involved in WQ MS system.<br>• To ensure regular updation of database and other information in M&E system.<br>• To analyse graphical presentation of the progress of the programme.<br>• To be responsible for any other related task/tasks assigned by the Director, WSSO.</td></tr>
<tr><td>5</td><td>Junior/Sectional Engineer</td><td>• To be responsible for the technical/ engineering component of the sector programmes<br>• To undertake extensive field visits for programme purposes.</td></tr>
</table>

